**हंगाम २०१९-२० मध्ये किमान आधारभूत दराने खरेदी केलेल्या कापसाची रक्कम शेतकऱ्यांना अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी (बिनव्याजी) कर्ज मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कापूस-२०१९/प्र.क्र.५३/१०-स**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दि. २० मार्च, २०२०.**

**संदर्भ:-** वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.८ जुलै २०१९

**प्रस्तावना:-**

केंद्रीय वस्त्रोद्योग मंत्रालयाच्या दिनांक ०१.१०.२०१९ च्या आदेशान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाची केंद्र शासनाच्या मुख्य अभिकर्ता भारतीय कपास निगम मर्या.,(सी.सी.आय.) यांचे उपअभिकर्ता म्हणून राज्यात किमान आधारभूत दराने कापसाची खरेदी करण्यासाठी नियुक्ती केली आहे. तथापि, या प्रयोजनासाठी केंद्र शासन/सी.सी. आय.द्वारे Line of credit (रोख पत), letter of comfort किंवा Advance कापूस पणन महासंघाला दिला जाणार नाही. यास्तव, हंगाम २०१९-२० मध्ये किमान आधारभूत दराने कापूस खरेदी केल्यानंतर कापसाचे चुकारे शेतकऱ्यांना वेळेत अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाला बॅकाकडून/वित्तीय संस्थाकडून कर्ज घेण्यासाठी दुराव्यापोटी (बिनव्याजी) कर्ज (मार्जीन मनी) मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात "कापूस प्रापण योजनेच्या कार्यन्वयनासाठी सीमांतिक रक्कम (कार्यक्रम)" या लेखाशीर्षांतर्गत रुपये १६०.०० कोटी अर्थसंकल्पीय तरतूद केलेली आहे. वित्त विभाग,शासन निर्णय दि.८ जुलै २०१९ अन्वये प्राप्त अधिकारान्वये,हंगाम २०१९-२० मधील कापूस खरेदी योजनेंतर्गत कापूस उत्पादक पणन महासंघाने शेतकऱ्यांकडून खरेदी केलेल्या /करावयाच्या कापसाचे चुकारे वेळेत अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित रुपये १६०.०० कोटी (रुपये एकशे साठ कोटी फक्त) एवढ्या रकमेतून रुपये ९६.०० कोटी (रुपये शहाण्णव कोटी फक्त) एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास बॅकाकडून/वित्तीय संस्थाकडून दुराव्यापोटी (बिनव्याजी) कर्ज स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूरी देत आहे.

१) सदर मार्जीन मनीचा उपयोग महासंघाद्वारे कापूस उत्पादक शेतक-यांचे किमान आधारभूत दराने खरेदी केलेल्या कापसाचे चुकारे अदा करण्यासाठी दुरावा म्हणून विनियोग करावा लागेल,.याबाबतची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाची राहील.

२) सदर मार्जीन मनी इतरत्र बॅंकेत दिर्घ मुदतीच्या ठेवीत गुंतविण्यात येऊ नये.

३) हंगाम संपल्यावर सदर मार्जीन मनीची शासनास तात्काळ परतफेड करावी लागेल. जर हे शक्य झाले नाही तर त्यामागील कारणे शासनास कळविणे आवश्यक राहील.

४) ज्या प्रयोजनासाठी मर्जीन मनी वितरित करण्यात आला आहे,त्याच प्रयोजनासाठी विनियोग करुन ३ महिन्यात तसे शासनास उपयोगिता प्रमाणपत्र सादर करने बंधनकारक राहील.

५) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाने भारतीय कपास निगम सोबत यासंदर्भात रितसर करार करावा.

०२. या कारणासाठी होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० मध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदींमधून भागविण्यात यावा: -

मागणी क्रमांक व्ही-५
६४२५, सहकारासाठी कर्जे
१०८-इतर सहकारी संस्थांना कर्जे
(०१) पणन सहकारी संस्था
(०१) (०३) कापूस प्रापण योजनेच्या कार्यन्वासाठी सीमांतीक रक्कम
(६४२५ ००६४) (कार्यक्रम)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

०३. महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघास दुराव्यापोटी सन २०१५-१६, २०१६-१७, २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये दिलेल्या रुपये २०० पैकी रुपये ६२ कोटी इतका मार्जीन मनी महासंघाने शासनास अद्याप परत केलेला नाही. सदर रक्कम महासंघाने दिनांक ३१ मार्च, २०२० पूर्वी शासनास परत करावी.

०४. सदर बिनव्याजी कर्जाची रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई येथून काढण्यासाठी व ती महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या.,मुंबई या संस्थेस अदा करण्यासाठी श्री.र.गं.बोड्डू, कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी, तसेच श्री.का.गो.वळवी, उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०५. सदर रकमेचा धनादेश खाली नमूद केलेल्या यंत्रणेच्या नांवे काढण्यात यावा: -

"The Maharashtra State Co-operative Cotton Growers Marketing Federation Ltd. Mumbai"

महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या. मुंबई.

०६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भीय क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३,दि.८ जुलै २०१९ नुसार प्राप्त अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यातआला असून त्याचा संकेतांक २०२००३२०१७३१५६१४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032,
street=MANTRALAYA , MUMBAI ,
serialNumber=8c5d0f275c3d9a21db07fecf7919c2d83796e88930d62d44e7a4a6d4cbee7e0e, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=KALU GONYA VALVI
Date: 2020.03.20 17:39:45 +05'30'

**(का.गो.वळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, मुंबई-प्रथम/नागपूर - द्वितीय (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. वित्त विभाग, (व्यय-२/अर्थोपाय/अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. उप सचिव (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (१-स) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (१०-स).